राज्यातील ग्रामीण क्षेत्रात नाबार्डच्या अर्थसहाय्याने "ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम " अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना

## महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-२०१४/प्र.क्र.०४/पापु.०८**

**७ वा मजला गो.ते.रुग्णालय संकुल इमारत,**

**मंत्रालय, मुंबई-४००००१.**

तारीख: **५ ऑगस्ट, २०१४.**

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. संस्वअ-२०११/ प्र.क्र.२२८/पापु-१६ दि.२९ मार्च २०१२.

**प्रस्तावना :-**

निरोगी जीवनाच्या स्वच्छ व पिण्यायोग्य पाण्याची उपलब्धता तसेच सुयोग्य स्वच्छता या मुलभूत गरजा आहेत. वैयक्तीक आणि सामाजिक आरोग्याचे संरक्षण व संवर्धनासाठी राज्य शासनाकडून विविध योजना राबविण्यात येत आहेत. या योजनांमध्ये संत गाडगेबाबा ग्रामीण स्वच्छता अभियान, निर्मल भारत अभियान, पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजना (Eco Village, Clean Village) इ. योजनांचा समावेश आहे. या सर्व योजनांव्दारे वैयक्तीक स्वच्छता सुविधा पुरविण्यावर मुख्यत्वे करुन भर देण्यात आलेला आहे.

महाराष्ट्र हे औद्योगिक व सामाजिकदृष्टया प्रगतीशील राज्य असल्याने येथे खेडयांचे नागरीकरण फार वेगाने होत आहे व याचाच परिपाक म्हणून ग्रामीण भागात, सांडपाणी व्यवस्थापनाची समस्या मोठया प्रमाणावर भेडसावत आहे. शास्त्रोक्त पध्दतीने सांडपाण्याची विल्हेवाट न लावल्याने नद्या, तलाव आणि तळयांमध्ये प्रक्रिया विरहीत सांडपाणी प्रवाहीत होत असल्याने जलप्रदुषणाची समस्या निर्माण झालेली आहे.

बव्हंशी साथींच्या रोगांचा उद्रेक व तत्सम आजार हे माश्या व डासांमुळेच होतात. माश्या व डास तयार होण्याचे मुख्य कारण म्हणजे नैसर्गिक पध्दतीने जागा मिळेल तेथे प्रवाहीत होणारे सांडपाणी डबक्याच्या स्वरुपात साठणे. हे सर्व दुष्टचक्र टाळावयाचे असेल तर ग्रामीण भागात निर्माण होणाऱ्या घरगुती सांडपाण्यावर शास्त्रोक्त पध्दतीने प्रक्रिया करुन ते पुनर्वापरासाठी तयार करणे हा एकमेव उपाय ठरतो.

संपूर्ण स्वच्छतेचे उद्दीष्ट गाठण्यासाठी सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन करणे तितकेच महत्वाचे आहे. ज्या ग्रामपंचायतीची लोकसंख्या १५००० व त्यापेक्षा जास्त आहे अशा ठिकाणी प्राधान्याने सांडपाण्याचे नियोजन करणे आवश्यक आहे.

'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमाव्दारे', ग्रामीण भागातील सांडपाण्यावर प्रक्रीया करुन त्याची सुनियोजित विल्हेवाट लावल्यामुळे या भागातील जनतेच्या आरोग्यात सुधारणा होऊन त्यांचे राहणीमान निश्चितच उंचावेल. तसेच प्रक्रीया केलेले सांडपाणी शेतीच्या वापरासाठी उपलब्ध झाल्याने शेतीचाही फायदा होणार आहे. तसेच पाण्याचा पुनर्वापर हे एक महत्वाचे उद्दीष्ट देखील साध्य झाल्याने, पाण्याची बचत देखील होणार आहे. सांडपाण्याचा पुनर्वापर ही बाब ग्रामीण क्षेत्रामध्ये विकासाठी निश्चितपणे सहाय्यभूत ठरणार आहे.

या अनुषंगाने शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातर्फे राज्यातील ग्रामीण क्षेत्रामधील एकूण ९४ गावांमध्ये, नाबार्ड अर्थसहाय्यीत 'सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प' राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे (संदर्भीय शासन निर्णय वाचावा). सन २००१ च्या जनगणनेनुसार, ज्या गावांची लोकसंख्या १५००० वा त्यापेक्षा जास्त आहे, ती गांवे लोकसंख्येच्या उतरत्या क्रमानुसार (As per descending order), सदर प्रकल्पात समाविष्ट केली होती. या प्रकल्पासाठी ९५% RIDF-XVII मालिके अंतर्गत नाबार्ड बँकेचे कर्ज स्वरुपात अर्थसहाय्य व उर्वरीत निधी शासकीय अनुदान स्वरुपात शासनाकडून उपलब्ध होणार होता. या ९४ गावांमधील सांडपाण्यावर प्रक्रीया करण्यासाठी केवळ 'सांडपाणी प्रक्रीया केंद्राचाच' विचार करण्यात आलेला होता (प्रपत्र-१). म्हणजेच या प्रकल्पात सांडपाणी संकलन व्यवस्था (Collection system) आणि सांडपाणी वहन व्यवस्था (Conveyance system) या बाबी विचारात न घेता गावातील सांडपाण्यावर प्रक्रीया करण्यासाठी केवळ 'सांडपाणी प्रक्रीया केंद्र (Waste Water Treatment Plant)' बांधण्याचे निश्चित केले होते. तसेच या प्रकल्पांतर्गत, केंद्र शासनाच्या 'भारतीय प्रौद्योगिक संस्था (IIT) पवई ,मुंबई' आणि 'राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्था (NEERI) नागपूर' यांनी विकसित केलेल्या अनुक्रमे 'सॉईल बायो टेक्नॉलॉजी (SBT)' आणि 'फायटोरीड (Phytorid)' या दोन आधुनिक जैविक तंत्रज्ञानांचा वापर करुन सांडपाण्यावर प्रक्रीया करण्याचे प्रस्तावित होते. त्यानुसार या प्रकल्पाचे 'नियोजन आणि अंमलबजावणी'. शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिनस्त 'महाराष्ट्र जीवन प्राधिकरण' ही क्षेत्रियस्तरावरील यंत्रणा करीत आहे.

तथापि, सदर प्रकल्पाची 'नियोजन व प्रकल्प आखणीची' प्राथमिक कामे सुरु असताना, असे आढळून आले आहे की, बहुतांशी सर्वच गावांमध्ये अस्तित्वातील 'संकलन' आणि 'वहन' व्यवस्था यामध्ये दखल घेण्याजोगी तुटफूट झालेली आहे. त्यामुळे गावातील प्रस्तावित सांडपाणी प्रक्रीया केंद्रापर्यंत सर्व सांडपाणी एकत्रित करुन आणणे अडचणीचे ठरत आहे. त्याचबरोबर या सर्वच गावांमध्ये असलेली अस्तित्त्वातील 'संकलन व्यवस्था' आणि 'संवहन व्यवस्था' अपूरी ठरत आहे. परिणामी मंजूर प्रकल्पानुसार केवळ 'सांडपाणी प्रक्रीया केंद्र' बांधून गावातील सांडपाण्याचा प्रश्न समाधानकारकरित्या सुटणार नाही. यास्तव 'सांडपाणी संकलन व्यवस्था (Waste Water Collection System, Part-I)'

आणि 'सांडपाणी संवहन व्यवस्था (Waste Water Conveyance System, Part-II)' आणि 'सांडपाणी प्रक्रीया केंद्र (Waste Water Treatment Plant, -End Treatment- Part-III)' अशा तिनही घटकांचा समावेश या प्रकल्पाअंतर्गत करुन मूळ प्रकल्प सुधारीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते, जेणेकरुन, 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम' परिपूर्ण होऊ शकेल.

त्यामुळे आता मूळ प्रकल्पाचा सर्वांगाने अभ्यास करुन आणि त्यात कराव्या लागणाऱ्या सुधारणांचा आणि विस्ताराचा सर्वंकष विचार करुन, संदर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमीत करुन, पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

## शासन निर्णय :-

१) सुधारीत कार्यक्रमामध्ये सांडपाणी 'संकलन व्यवस्था' आणि 'संवहन व्यवस्था' तसेच मूळ प्रकल्पातील 'सांडपाणी प्रक्रीया केंद्र' यांचा समावेश करुन या कार्यक्रमास यापुढे "ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम " असे संबोधण्यात येत आहे. सदरचा "ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम " हा एकूण तीन टप्या मध्ये पुढीलप्रमाणे राबविण्यात येईल.

अ) टप्पा-१:- सन २००१ च्या जनगणनेनुसार ग्रामपंचायत अस्तित्वात असलेल्या सेन्सस टाऊनसह ज्या गावांची लोकसंख्या १५,००० वा त्याहून जास्त आहे अश्या २८ गावांसाठी "ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम, टप्पा-१."

(शासन निर्णय दि.२९.३.२०१२ अन्वये ज्या गावांनी सदर प्रकल्पासाठी आवश्यक ठराव जागा विनामुल्य उपलब्ध करुन दिल्या आहेत, अशा गावांच्या प्रस्तावांना नाबार्डने मान्यता दिली आहे.)

ब) टप्पा-२:- सन २००१ च्या जनगणनेनुसार ज्या गावांची लोकसंख्या ग्रामपंचायत अस्तित्वात असलेल्या सेन्सस टाऊनसह १५,००० पेक्षा जास्त आहे, अश्या ३० गावांसाठी "ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम " टप्पा-२"

(जी गावे प्राधान्याने सदर प्रकल्पासाठी आवश्यक ठराव व जागा विनामूल्य उपलब्ध करुन देतील अश गावांचे प्रस्ताव)

क) टप्पा-३:- सन २००१ च्या जनगणनेनुसार ज्या गावांची लोकसंख्या ग्रामपंचायत अस्तित्वात असलेल्या सेन्सस टाऊनसह १५,००० पेक्षा जास्त आहे अश्या उर्वरीत गावांसाठी "ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम " टप्पा-३"

वरील तीनही टप्या मधिल ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम " हा शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिनस्त असलेल्या 'महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई' या क्षेत्रिय स्तरावरील यंत्रणेकडूनच राबविण्यात येईल.

या कार्यक्रमातंर्गत गावातील केवळ घरगुती सांडपाण्याचाच (Domestic Waste Water) विचार करण्यात येईल. औद्योगिक सांडपाण्याच्या बाबतीत, शासनाच्या औद्योगिक विकास महामंडळ आणि महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाकडून योग्य ती कार्यवाही नेहमी प्रमाणे केली जाईल.

ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमांतर्गत, सद्यस्थितीत टप्पा-१ मधील २८ गावांना RIDF-XIX अंतर्गत कर्ज सहाय्य देण्याच्या प्रस्तावास नाबार्डची मान्यता प्राप्त झाली आहे. तद्नंतर उर्वरीत गावांचे प्रस्तावही नाबार्ड अर्थसहाय्यासाठी सादर करण्यात यावेत.

२) “ ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम - प्रत्येक गावाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये, (Detailed Project Report - DPR) या कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी खालील घटकांचा समावेश असेल

अ) गावांमधील सांडपाण्याचे संकलन करणे. (Part-I Collection System) :-

यामध्ये गावातील अस्तित्वातील तुटलेल्या गटारींची दुरुस्ती करणे तसेच मुख्यत्वे करुन प्रस्तावित सांडपाणी प्रक्रीया केंद्राच्या परिसरातील (Contributing Area of Waste Water Treatment Plant) गटार व्यवस्था बळकट करण्यासाठी नव्याने बांधावयाच्या गटारींच्या कामाचा समावेश असेल.

ब) संकलित केलेल्या सांडपाण्याचे, सांडपाणी प्रक्रीया केंद्रापर्यंत एकत्रित संवहन करणे (Part-II Conveyance System / Connectivity) :-

यामध्ये गावातील वेगवेगळया ठिकाणी सोडण्यात येणारे (Various out falls) सांडपाणी एकत्रित करुन सांडपाणी प्रक्रीया केंद्रापर्यंत त्याचे संवहन करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या कामांचा समावेश असेल.

क) गावातील सांडपाण्यावर सांडपाणी प्रक्रीया केंद्राव्दारे जैविक प्रक्रीया करणे (Part-III Waste Water Treatment Plant - End Treatment) -

सांडपाणी प्रक्रीया केंद्रासह तत्सम उपांगांचे बांधकाम, प्राथमिक पंपींग व्यवस्था, विद्युत जोडणी, संरक्षक भिंत इ. कामांचा समावेश यामध्ये असेल. यामध्ये एकत्रित सांडपाण्यावर सॉईल बायो अथवा फायटोरीड यापैकी योग्य त्या तंत्रज्ञानाद्वारे प्रक्रिया केली जाईल.

ड) इतर आवश्यक अनुषंगिक कामे :-

(I) माहिती, शिक्षण व संवाद कौशल्य (IEC).

(II) गावातील सांडपाण्याची सदयस्थिती दर्शविणारा नकाशा (Village map showing present scenario of waste water) तयार करण्यासाठी गावाचे आवश्यक सविस्तर सर्व्हेक्षण करणे ज्यामध्ये सांडपाण्याचे नमुने तपासणे, गावात प्रत्यक्षात तयार होणारे सांडपाणी मोजणे (Flow Measurement), सद्यस्थितीतील संकलन आणि संवहन व्यवस्था, तूटफूट झालेल्या गटारींची मोजमापे, प्रस्तावित सांडपाणी प्रक्रीया केंद्राच्या जागेचा नकाशा तयार करणे इत्यादी कामांचाही समावेश असेल.

(III) ज्या क्षेत्रातील सांडपाणी प्रस्तावित सांडपाणी प्रक्रिया केंद्रापर्यंत येऊ शकत नसेल त्या क्षेत्रासाठी इतर पर्यायी प्रक्रीया व्यवस्था करणे जसे सोकपिट बांधणे इत्यादी.

(IV) सांडपाणी प्रक्रिया केंद्राच्या पहिल्या दोन वर्षांची दैनंदिन देखभाल दुरूस्ती आणि गावकऱ्यांना सांडपाणी प्रक्रिया केंद्राच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीच्या मार्गदर्शक पुस्तिकेसह प्रशिक्षण देणे आणि गावकऱ्याची क्षमता बांधणी (Training and Capacity Building) करणे.

(V) विशेष बाबींची तरतूद (सल्लागार, तंत्रज्ञान सेवा पुरवठादार इत्यादी.

३) आधारभूत जनगणना वर्ष तसेच लोकसंख्या निकष :-

'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम मध्ये, सन २००१ च्या जनगणनेनुसार ज्या गावांची लोकसंख्या १५००० वा त्याहून अधिक आहे, तसेच जेथे ग्रामपंचायत अस्तित्वात आहे अश्या सर्व गावांचा (Census Towns सह) समावेश करण्यात आला आहे. त्यामुळे पूर्वीच्या मंजूर ९४ गावांऐवजी आता ही गावांची संख्या ११० होत आहे. प्रकल्पात समाविष्ट होण्यासाठी सन २००१ च्या जनगनणेनुसार गांव हे एकक (Unit) असून ग्रामपंचायत हे एकक असणार नाही. तसेच ज्या गावांच्या सन २००१ च्या जनगणनेनुसार त्या गावास लागू असलेल्या वाडया व वस्त्यांचा समावेश आहे, अशा वाडया व वस्त्यांचा या कार्यक्रमामध्ये समावेश करताना त्या वाडया / वस्त्यांची आर्थिक व तांत्रिक व्यवहार्यता तपासून त्यानुसार आवश्यक तो योग्य निर्णय 'महाराष्ट्र जीवन प्राधिकरण' ही अंमलबजावणी यंत्रणा घेईल.

४) गावांची निवड व प्राधान्य :-

या कार्यक्रमाच्या लोकसंख्येचा निकष पूर्ण करणाऱ्या सर्व गावांची, लोकसंख्येच्या उतरत्या क्रमाने (Descending order मध्ये) मांडणी करण्यात येईल.

तथापि, या गावां मधील, ज्या गावांनी योजना स्विकृतीचा ठराव, योजनेसाठी आवश्यक ती जागा उपलब्ध करुन देणे, योजना दैनंदिन देखभाल व दुरुस्तीसाठी ताब्यात घेणे व प्रक्रीया केलेल्या सांडपाण्याचा पुनर्वापर करणे याबाबतचा विहित नमुन्यातील (प्रपत्र-२) या सर्व मुद्यांचा समावेश असलेला ग्रामसभेचा ठराव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे सादर केला असेल आणि त्या ठरावानुसार सांडपाणी प्रक्रीया केंद्रासाठी आवश्यक ती जागा तातडीने प्रत्यक्षात उपलब्ध करुन दिलेली असेल, अशा गावांना वर नमुद केल्याप्रमाणे, लोकसंख्येच्या उतरत्या क्रमात, प्राधान्य देण्यात येईल. ज्या गावांनी ग्रामसभेचा सदर ठराव, आणि / किंवा प्रक्रीया केंद्रासाठी जागा उपलब्ध करुन दिलेला नसेल, अथवा इतर आवश्यक गोष्टींची पुर्तता केलेली नसेल तर अशा गावांचा प्राधान्यक्रम बदलण्याचा अधिकार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास असेल.

ज्या गावांकडून सदर प्रकल्पासाठीचे आवश्यक ठराव व जागा विनामूल्य उपलब्ध करुन दिली जाणार नाहीत ती गावे या प्रकल्पामधून वगळण्यात येतील. याबाबतचे प्रस्ताव महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या शासन निर्णयाच्या दिनांकापासून चार महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावेत. या चार महिन्याच्या कालमर्यादेत संबंधित ग्रामपंचायतींनी आवश्यक ती विहित कार्यवाही न केल्यास सदर गावे या प्रकल्पामधून वगळयात येतील व त्याची संपूर्ण जबाबदारी सदर ग्रामपंचायतीची राहील.

५) सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमातंर्गत टप्पेनिहाय प्रकल्प (Stage-wise Projects In Waste Water Management Programme ) :-

सन २००१ च्या जनगणनेनुसार पात्र ठरणाऱ्या व उपरोक्त निकष पूर्ण करणाऱ्या गावांचे मुद्या क्र.१ मध्ये प्रस्तावित केल्यानुसार टप्पेनिहाय (Stage-wise) प्रस्ताव तयार करण्यात येतील. तसेच या

टप्प्यात समाविष्ट असलेल्या गावांसाठी Phytorid व SBT या दोन तंत्रज्ञानावर आधारीत प्रकल्प प्रस्तावित करण्यात यावेत. याखेरीज अन्य तंत्रज्ञान पर्यायांपैकी सुयोग्य पर्यायाचा शासनाच्या पुर्वसंमतीने उपयोग करण्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला प्राधिकृत करण्यात येत आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत सादर करण्यात आलेल्या प्रत्येक टप्प्याच्या प्रस्तावास (For each stage wise project) नाबार्डने सहमती दिल्यावर त्यास शासनाकडून प्रथम तत्वत: प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येईल. त्यानंतर प्रत्येक गावाचा सविस्तर प्रकल्प अहवाल महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून तयार करण्यात येईल. हे सविस्तर प्रकल्प अहवाल महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडील सक्षम प्राधिकाऱ्याकडून तांत्रिक मंजूरी प्रदान झाल्यानंतर, शासनास सादर करण्यात येतील. त्यानंतर प्रत्येक गावाच्या सविस्तर प्रकल्प अहवालास शासनाकडून स्वतंत्रपणे प्रशासकीय मंजूरी देण्यात येईल.

६) सांडपाण्याच्या विविध पॅरामिटर्सनुसार घ्यावयाच्या चाचण्या :-

प्रत्येक गावातील सांडपाणी नमुने, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या अधिकृत प्रयोगशाळेमध्ये पाठविण्यात येतील व ज्या ठिकाणी अशया प्रकारची प्रयोगशाळा उपलब्ध नसेल त्या ठिकाणी शासनाने मान्यता दिलेल्या प्रयोगशाळेतून हे नमुने तपासले जातील. या सांडपाण्याच्या भौतिक, रासायनिक, जैविक चाचण्या घेण्यात येतील. या चाचण्यांद्वारे मुख्यत: जे पॅरामिटर्स तपासावयाचे आहेत त्याचे विवरण प्रपत्र-३ (अ) मध्ये केले आहे.

७) प्रक्रीया केलेल्या सांडपाण्याचे, मापदंडानुसार निकष :-

महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाचे शेतीसाठी वापरावयाच्या पाण्याचे मापदंड प्रपत्र ३(ब) मध्ये दर्शविण्यात आलेले आहेत. प्रक्रिया केलेल्या सांडपाण्याची गुणवत्ता या मापदंडाच्या मर्यादेत असावी.

८) कार्यक्रमात वापरावयाचे तंत्रज्ञान :-

सुधारीत 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमा 'मध्ये, गावातील केवळ घरगुती सांडपाण्यावर (Domestic Waste Water / Sullage वर) प्रक्रिया करावयाची आहे. कोणत्याही प्रकारच्या औद्योगिक सांडपाण्यावर प्रक्रिया करणे या प्रकल्पात अभिप्रेत नाही. कारण, औद्योगिक कंपन्यांनी त्यांच्या Industrial Waste Water / Industrial Effluents वर महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या मापदंडाच्या मर्यादेत प्रक्रिया करावयाची आहे. या Treated Industrial Effluents मधील रासायनिक आणि जैविक घटकांचे परिमाण वरील मापदंडाच्या मर्यादेत असेल व असे Waste Water थेट संकलन व्यवस्थेमध्ये सोडलेले असेल तर त्याचा विचार या कार्यक्रमामध्ये करण्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने योग्य तो निर्णय घेऊन उपलब्ध शासनमान्य तंत्रज्ञानापैकी योग्य तंत्रज्ञानाची निवड करावी. या कार्यक्रमातील प्रकल्प अहवालात समाविष्ट करावयाचे भाग-३ मधील सांडपाणी प्रक्रीया केंद्र (Part III - End Treatment) बांधण्यासाठी उपरोक्त मुद्या क्र.२ मध्ये नमुद केल्याप्रमाणे सध्या दोन भारतीय अधिकृत व नामांकित संस्थांनी विकसित केलेले खालील जैविक तंत्रज्ञान (प्रपत्र-३-(क)) वापरण्यात येईल.

१. भारतीय प्रौद्योगिकी संस्था (IIT) पवई, मुंबई यांनी विकसित केलेले ' सॉईल बायो टेक्नॉलॉजी (SBT)' तंत्रज्ञान.

२. राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्था (NEERI) नागपूर यांनी विकसित केलेले ' फायटोरीड (Phytorid) ' तंत्रज्ञान.

उपरोक्त दोन्ही तंत्रज्ञानापैकी कोणत्या गावात कोणते तंत्रज्ञान वापरावे याचा निर्णय महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून घेण्यात येईल. भविष्यात आवश्यकतेनुसार आर्थिक व तांत्रिकदृष्टया प्रभावी, तसेच ग्रामीण पातळीवर दैनंदिन देखभाल व दुरुस्तीसाठी सुयोग्य असलेल्या इतर तंत्रज्ञानांचा वापर या कार्यक्रमात करावयाचा असल्यास त्याचा योग्य तो अभ्यास, नागरी घनकचरा व्यवस्थापन व मलनिःसारण या विषयावर आधारीत वेगवेगळया तंत्रज्ञानाची माहिती व वापर करण्यासाठी तंत्रज्ञान व पुरवठादाराची राज्यस्तरीय अनुसूची तयार करण्यासंदर्भात शासन स्तरावर नेमलेल्या तांत्रिक समितीमार्फत (शासन निर्णय क्र.घकव्य/२०१२/प्र.क्र.६९८/२२ दि.१८ एप्रिल, २०१३) झाल्यानंतर, त्यांच्या शिफारशीनुसार शासन मान्यतेने इतर तंत्रज्ञानाचा वापर देखील भविष्यात या कार्यक्रमात करण्यात येईल.

९) कार्यक्रमास अर्थसहाय्य वित्तीय आकृतीबंधः-

या कार्यक्रमास नाबार्ड बँकेचे कर्ज व शासनाचे अनुदान या दोन माध्यमातून पुढील प्रमाणे अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येईल.

९ अ) नाबार्डचे अर्थसहाय्य :- मूळ प्रकल्प नाबार्ड बँकेच्या, “RIDF-XVII” या कार्यक्रमांतर्गत आर्थिक सहाय्यासह मंजूर करण्यात आलेला होता. मात्र आता सुधारीत धोरणानुसार प्रस्तावित 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन या कार्यक्रमास, नाबार्ड बँकेच्या “RIDF-XIX” व त्यापुढील मालिकेअंतर्गत अर्थसहाय्य प्राप्त होईल.

'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमा मधील प्रत्येक टप्प्यातील (In each stage), प्रत्येक गावाच्या (Each village) निव्वळ प्रकल्प किंमतीच्या ९५% एवढी रक्कम नाबार्ड बँकेतर्फे कर्ज रुपात RIDF-XIX व त्यापुढील मालिकांमध्ये उपलब्ध होईल.

नाबार्ड- RIDF-XIX अंतर्गत प्रस्तावित गावांचे 'सविस्तर प्रकल्प अहवाल (DPRs)' टप्प्या टप्प्याने सादर करावयाचे असल्याने, कर्जाची रक्कम ही त्या त्या वेळी सादर केलेल्या टप्पे निहाय सविस्तर प्रकल्प अहवालाच्या (DPR च्या) किंमतीनुसार वेगवेगळी असणार आहे.

९ ब) शासनाचे अनुदान :-

'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमा मधील' प्रत्येक टप्प्यातील (In each stage), प्रत्येक गावाच्या (Each village) ढोबळ प्रकल्प किंमती पैकी नाबार्डतर्फे प्राप्त होणाऱ्या कर्जाची रक्कम वजा करता, प्रकल्पाची उर्वरीत रक्कम शासकीय अनुदान (GIA) स्वरुपात शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल.

१०) प्राधिकरणाचे अंमलबजावणी शुल्क (इ अँड पी) :-प्रस्तुत 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम' ची क्षेत्रिय स्तरावरील अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण सध्या ९% सेवाशुल्काने करेल. भविष्यात या सेवाशुल्कामध्ये आवश्यकतेनुसार सुधारणा करण्याबाबत शासन स्तरावर योग्य तो निर्णय घेण्यात येईल. सदर सेवाशुल्काची रक्कम ही प्रत्येक गावाच्या प्रकल्पाच्या ढोबळ किंमतीमध्ये समाविष्ट असेल.

११) कार्यक्रम अंमलबजावणी कालावधी :-

RIDF-XIX अंतर्गत ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमा मधील प्रत्येक टप्प्यांतर्गत (In every stage) असलेल्या प्रत्येक गावाच्या, प्रकल्प नियोजनाचा आणि अंमलबजावणीचा एकूण कालावधी दोन वर्षांचा असेल व सविस्तर प्रकल्पातील सर्व उपांगांचे बांधकाम पूर्ण झाल्यावर, केवळ सांडपाणी प्रक्रीया केंद्राच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीचा कालावधी दोन वर्षांचा असेल. तथापि, ज्या दिवशी संकलन, वहन आणि प्रक्रीया केंद्राचे कामकाज समाधानकारकरित्या पूर्ण होऊन सांडपाणी योजना कार्यान्वित (Commissioned) होईल, त्या तारखेपासून देखभाल व दुरुस्तीचा पुढील दोन वर्षाचा कालावधी सुरु झाला असे समजण्यात येईल.

१२) मंजूर प्रकल्पावर आतापर्यंत झालेल्या खर्चाचे समायोजन :-

RIDF-XIX अंतर्गत, या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत, संदर्भीय शासन निर्णयातील निर्देशानुसार प्रकल्पाचे नियोजन व अंमलबजावणी करत असताना, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचा आजपर्यंत म्हणजेच या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत, जो खर्च क्षेत्रियस्तरावर आणि मध्यवर्ती कार्यालयाच्यास्तरावर झालेला आहे, तो संपूर्ण खर्च RIDF-XVII अंतर्गत खर्ची घालण्यात येईल. RIDF-XIX अंतर्गत सांडपाणी प्रक्रीया प्रकल्प प्रस्ताव मंजूर झाल्यानंतर RIDF-XVII चा प्रकल्प बंद करण्यात येईल व त्यापोटी नाबार्डकडून शासनास प्राप्त झालेला कर्ज निधी RIDF-XiX अंतर्गत मिळाला आहे असे समजून समायोजन करण्यात येईल.

१३) तंत्रज्ञान पुरवठादारांशी करावयाचा करारनामा:-

वरील परिच्छेद क्र. ८ मध्ये नमुद केल्याप्रमाणे, ज्या दोन जैविक तंत्रज्ञानाचा वापर या ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमा मध्ये करुन सांडपाण्यावर प्रक्रीया केली जाणार आहे. सदर जैविक तंत्रज्ञान हे पेटेंटेड टेक्नॉलॉजी असल्याने, सार्वजनिक स्तरावर त्याचा उपयोग होणार असल्याने सामंजस्य करारनामा करणे आवश्यक आहे. ती तंत्रज्ञाने ज्यांनी विकसित केलेली आहेत, अशा राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्था (NEERI)नागपूर आणि भारतीय प्रौद्योगिक संस्था (IIT) पवई, मुंबई यांच्याशी योग्य त्या नमुन्यामध्ये सामंजस्य करारनामा (MoU) करण्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास प्रधिकृत करण्यात येत आहे. सदर जैविक तंत्रज्ञानाचा वापर करुन सांडपाण्यावर प्रक्रीया केल्यानंतर तयार होणाऱ्या पाण्याची गुणवत्ता महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या मापदंडाच्या मर्यादेत राहील, याची जबाबदारी तंत्रज्ञान पुरवठादारावर राहील, अशी हमी सदर तंत्रज्ञान पुरवठादाराने सांमजस्य करारनाम्याव्दारे देणे आवश्यक आहे.

१४) तंत्रज्ञान पुरवठादारांचे सल्लागार सेवाशुल्क आणि Culture च्या दरास मंजूरी :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने तंत्रज्ञान पुरवठादारांचे सल्लागार सेवाशुल्क आणि Culture च्या दराबाबत योग्य तो अभ्यास करुन, सदर दरांचा प्रस्ताव त्यांचे स्तरावर मान्य करण्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास प्राधिकृत करण्यात येत आहे.

१५) आवश्यक लोकवर्गणी व जागेची उपलब्धता :-

प्रस्तुत ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमासाठी कोणत्याही प्रकारची लोकवर्गणी आकारण्यात येणार नाही. तथापि, या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी तंत्रज्ञान पुरवठादाराच्या सल्ल्याने निश्चित केलेली, तांत्रिकदृष्टया उपयुक्त असलेली सांडपाणी प्रक्रीया केंद्रासाठी लागणारी जागा तसेच अनुषंगिक संकलन व संवहन व्यवस्थेसाठी आवश्यक जागा नि:शुल्क उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी ही सर्वस्वी त्या ग्रामपंचायतीची असेल. प्रकल्पासाठी जागा उपलब्ध करण्यासाठी ग्रामपंचायतीस आवश्यक ती सर्व प्रशासकीय मदत जिल्हा परिषदेने आणि जिल्हाधिकारी कार्यालयाने करावयाची आहे. त्यासाठी प्रकल्प अहवालात कोणत्याही प्रकारची आर्थिक तरतूद करण्यात येऊ नये.

१६) प्रकल्पातील सांडपाणी प्रक्रीया केंद्राची देखभाल / दुरुस्ती व ग्रामस्थांची प्रशिक्षणाव्दारे क्षमता बांधणी :-

या कार्यक्रमातंर्गत बांधण्यात आलेले 'सांडपाणी प्रक्रीया केंद्र' कार्यान्वित झाल्यानंतर या प्रक्रीया केंद्राची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती पहिल्या दोन वर्षांसाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व तंत्रज्ञान पुरवठादार यांच्यामार्फत करण्यात येईल. या कालावधीत प्रकल्पातील सांडपाणी प्रक्रीया केंद्र वगळता उर्वरीत सर्व व्यवस्थांची, म्हणजेच सांडपाणी संकलित करणे व संकलित सांडपाण्याचे संवहन करणे या व्यवस्थांची, दैनंदिन देखभाल व दुरुस्ती करण्याची जबाबदारी ही त्या त्या ग्रामपंचायतीची राहील. या दोन वर्षाच्या देखभाल व दुरुस्तीच्या काळात ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांना, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व तंत्रज्ञान पुरवठादार यांचेकडून सांडपाणी प्रक्रिया केंद्राच्या देखभाल व दुरुस्तीच्या अनुषंगाने प्रशिक्षण देऊन त्यांची क्षमता बांधणी करण्यात येईल. तसेच तंत्रज्ञान पुरवठादाराकडून 'सांडपाणी प्रक्रीया केंद्राची देखभाल व दुरुस्तीची मार्गदर्शक पुस्तिका' तयार करुन ती ग्रामपंचायतीला देण्यात येईल. ज्या तारखेस महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संबंधीत कार्यकारी अभियंता हे निविदेतील अटी व शर्तीनुसार सांडपाणी प्रक्रीया केंद्राचे बांधकाम पूर्ण झालेले आहे व संकलन तसेच संवहन व्यवस्थेची सर्व कामे पूर्ण होऊन गावातील सांडपाणी प्रस्तावित सांडपाणी प्रक्रीया केंद्रापर्यंत येत आहे असे लेखी स्वरुपात प्रमाणित करतील त्या दिनांकास नियोजन व अंमलबजावणीचा टप्पा पूर्ण झालेला असेल व या तारखेपासून देखभाल व दुरुस्तीचा टप्पा सुरु होईल

१७) प्रक्रीया केलेल्या सांडपाण्याचा पुनर्वापर :-

सांडपाणी प्रक्रीया केंद्राव्दारे मिळणाऱ्या प्रक्रीयोत्तर पाण्याचा पुनर्वापर प्रामुख्याने शेतीसाठी करावयाचा आहे. ज्या ठिकाणी शेतीसाठी वापर करणे शक्यच नसेल अशा ठिकाणी या प्रक्रीया केलेल्या सांडपाण्याचा वापर भूजल पुनर्भरण अथवा पिण्याच्या पाण्याखेरीज अन्य प्रयोजनाकरीता करण्यात

यावा. तसेच गावासाठी सांडपाणी निर्मुलनाची सुविधा उपलब्ध झाल्याने ग्रामपंचायतीने ग्रामस्थांवर ग्रामपंचायत कायद्यातील तरतूदीनुसार योग्य तो सांडपाणी व्यवस्थापन कर आकारावा. पाण्याच्या पुनर्वापराबाबतची संपुर्ण जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील. सांडपाणी प्रक्रीया केंद्राची देखभाल व दुरुस्ती स्वयंसंतुलित (Self Sustainable) राहण्यासाठी प्रस्तावित सांडपाणी पट्टीचे दर परिगणित करावेत व ते प्रत्येक गावाच्या प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ट करण्यात यावेत. पाण्याच्या पुनर्वापरामुळे मिळणारे उत्पन्न आणि सांडपाणी व्यवस्थापन कर याव्दारे प्राप्त होणारे उत्पन्न या मधून देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा, ज्या योगे गावातील सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प आर्थिकदृष्टया स्वयंसंतुलित (Financially self sustainable) होईल.

१८) प्रकल्पाचे हस्तांतरण :-

या प्रकल्पातील सांडपाणी संकलन व संवहन या दोन्ही भागाची कामे पुर्ण होताच ती ग्रामपंचायतीने हस्तांतरीत करुन घेणे बंधनकारक राहील, मात्र भाग-३ मधील सांडपाणी प्रक्रिया केंद्राचा देखभाल व दुरुस्तीचा दोन वर्षांचा कालावधी पूर्ण होताच, ते केंद्र त्या त्या गावाच्या ग्रामपंचायतीने तातडीने हस्तांतरीत करुन घेणे बंधनकारक राहील. या प्रकल्पाच्या हस्तांतरणानंतर दैनंदिन देखभाल व दुरुस्तीची सर्व जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील. या हस्तांतरणा नंतर देखभाल व दुरुस्तीच्या कालावधीसाठी ग्रामपंचायत तंत्रज्ञान पुरवठादाराशी आवश्यक तो करार त्यांच्या स्तरावरुन, संबंधीत जिल्हापरिषदेच्या मार्गदर्शनाखाली करेल. यासाठी कोणत्याही प्रकारे वेगळे शासकीय अनुदान ग्रामपंचायतीस देय असणार नाही. सदरच्या प्रकल्पाची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती आर्थिकदृष्टया स्वयंसंतुलित होण्यासाठी आवश्यक ते कर बसविण्याचे अधिकार ग्रामपंचायतीस रहातील.

१९) ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमातील गावांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी सल्लागारांची नियुक्ती करणे :-

ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमातील प्रत्येक गावांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी सल्लागारांची नियुक्ती करण्याची आवश्यकता भासल्यास याबाबत केंद्र शासनाच्या दि.३१/८/२००६ च्या पत्रातील सल्लागार नियुक्तीबाबतच्या मार्गदर्शक तत्वानुसार सल्लागार नेमण्याची परवानगी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाास देण्यात येत आहे. या मार्गदर्शक तत्वानुसार गावांचे सर्वेक्षण करण्यासाठी सर्वे एजन्सी नेमणे, तंत्रज्ञान पुरवठादार नियुक्त करणे, इत्यादी बाबतची कार्यवाही महाराष्ट्र जीवन प्राधिकरण स्तरावर करण्यात यावी.

२०) "ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमामधील गांवनिहाय सविस्तर प्रकल्प अहवालाची (Detailed Project Reports ची) आखणी :-

या कार्यक्रमातील प्रत्येक टप्प्यातील, प्रत्येक गावांच्या सविस्तर प्रकल्प अहवालांची आखणी खालील प्रमाणे करण्यात येईल.

२०अ). या कार्यक्रमामध्ये समाविष्ट असलेल्या ज्या गावांनी योजना स्विकृतीचा ठराव, योजनेसाठी आवश्यक ती जागा उपलब्ध करुन देणे, योजना दैनंदिन देखभाल व दुरुस्तीसाठी ताब्यात घेणे व प्रक्रीया केलेल्या सांडपाण्याचा पुनर्वापर करणे याबाबतचे ग्रामसभेचे ठराव महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे सादर केले असतील व सांडपाणी प्रक्रीया केंद्रासाठी आवश्यक ती जागा प्रत्यक्षात उपलब्ध करुन दिली असेल अश्या गावांचे सविस्तर प्रकल्प अहवाल प्राधान्याने तयार करण्यात येतील. ज्या प्रमाणे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार होतील त्याप्रमाणे टप्पेनिहाय प्रकल्प अहवालांचा (State wise Project चा) प्रस्ताव प्राधिकरणाने मंजूरीसाठी शासनास व नाबार्ड कडे सादर करावा.

२०ब). सदरचा प्रकल्प पुढील १५ वर्षासाठी संकल्पित करावयाचा आहे. सबब, कार्यक्रमात समाविष्ट गावांची संकल्पित लोकसंख्या काढताना, CPHEEO Mannual / विविध शासन निर्णय / विविध शासन परिपत्रके यांचा आधार घेऊन, प्रत्येक गावाच्या गेल्या ५ दशकातील लोकसंख्यावाढीचा तसेच गावात व परिसरात उपलब्ध असणाऱ्या विकासाच्या बाबींचा सर्वंकष विश्लेषणात्मक अभ्यास करुन संकल्पित लोकसंख्या ठरवावी.

२०क). गावात संकलन होणाऱ्या सांडपाण्याचे एकूण परिमाण ठरविण्यासाठी, गावातील विविध ठिकाणच्या सांडपाणी प्रवाहांची मोजणी (Flow Measurement) करण्यात यावी. या परिमाणामध्ये भविष्यातील वाढीसाठी आवश्यक ती तरतूद करण्यात यावी व संकल्पीत वर्षात गावात निर्माण होऊ शकणारे सांडपाणी परिगणित करावे. गावात सांडपाणी प्रक्रीया केंद्रासाठी वापरावयाचे तंत्रज्ञान ठरविण्यासाठी, गावातील सांडपाण्याचे नमुने घेऊन त्यांची आवश्यक ती तपासणी वरील मुद्दा क्र. ६ मध्ये नमुद केल्याप्रमाणे यथायोग्य प्रयोगशाळेतून करुन घेण्यात यावी.

२०ड). सदरच्या कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्यासाठी या प्रकल्पात, सांडपाणी संकलित करण्यासाठी तसेच वहनासाठी Part-I Collection System & Part-II Conveyance System ची तरतूद करावयाची आहे. मात्र ही तरतूद करताना, कमीत कमी खर्चामध्ये गावातील जास्तीत जास्त भागातील सांडपाणी संकलन करुन ते नियोजीत सांडपाणी प्रक्रीया केंद्रापर्यंत पोहचेल याची खबरदारी घेण्यात यावी. सदरची तरतूद करताना, त्या गावात सांडपाणी संकलित करणे व त्याचे संवहन यासाठी अस्तित्वात असलेल्या व्यवस्थांचा जास्तीत जास्त वापर करण्यात यावा, कारण सदरच्या कार्यक्रमाचे मुख्य उद्दीष्ट हे गावात निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावर प्रक्रीया करणे व त्यामार्फत पर्यावरणाचे होणारे प्रदुषण कमी करणे हे आहे.

२०इ). सुधारीत ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमा मधिल प्रत्येक टप्प्यात समाविष्ट असलेल्या गावांसाठीच्या, सविस्तर प्रकल्प अहवालांना (अंदाजपत्रके व आराखडे) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने तांत्रिक मान्यता प्रदान करावी व ते सविस्तर प्रकल्प अहवाल प्रशासकीय मंजूरीसाठी शासनाकडे व नाबार्ड कडे अर्थसहाय्यासाठी सादर करण्यात यावेत.

२१) ग्रामस्थांना प्रशिक्षण आणि मार्गदर्शक पुस्तिकेबाबत :-

या प्रकल्पासाठी IIT, मुंबई व NEERI, नागपूर यांनी विकसित केलेल्या पेटेंटेड तंत्रज्ञानाचा वापर करुन प्रक्रीया केंद्र बांधावयाचे आहे. या करीता दोनही प्रक्रीया केंद्राची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती कशी करावी ? याकरीता कोणती काळजी घ्यावी ? इत्यादी बाबींचा समावेश असलेली मार्गदर्शक पुस्तिका दोन्ही संस्थांमार्फत ग्रामपंचायतीसाठी तयार करण्यात येईल. सदर पुस्तिका चित्रमय स्वरुपात (Pictorial) आणि मराठी व इंग्रजी भाषेत (User friendly language मध्ये) असेल. तसेच दोन वर्ष दैनंदिन देखभाल व दुरुस्ती काळात ग्रामपंचायतीच्या, पाणी पुरवठा व स्वच्छता समितीस सदर तांत्रिक पुरवठादारांनी प्रशिक्षण दयावे.

२२) ग्रामपंचायत / गांव पाणी पुरवठा स्वच्छता समितीची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या याबाबतचे विवेचन प्रपत्र-२(ब) मध्ये नमुद केले आहे.

२३) Eco Village अथवा Clean Village कार्यक्रमाशी संलग्नता :-

शासनाच्या ग्राम विकास विभागातर्फे सध्या ग्रामीण क्षेत्रात Eco Village आणि Clean Village शी निगडीत कार्यक्रम राबविला जात आहे. या 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रमा मधील गावांची निवड करताना अथवा प्राधान्यक्रम ठरविताना व्दिरुक्ती (Duplication) टाळण्यासाठी, ग्रामविकास विभागाच्या कार्यक्रमांची प्रस्तुत कार्यक्रमाशी योग्य तो अभ्यास करुन सांगड घातली जाईल.

सद्यस्थितीत सन २०११ च्या जनगणनेनुसार गावांची लोकसंख्या प्रसिध्द झालेली आहे. त्यामुळे त्या लोकसंखेवर आधारीत सांडपाणी व्यावस्थापन प्रकल्प राबविण्याबाबत आवश्येकतेनुसार स्वतंत्रपणे निर्देश देण्यात येतील.

वरील मार्गदर्शक सूचना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०२१३३७३३५७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Gitte

Digitally signed by Kiran Gitte
DN: CN = Kiran Gitte, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2014.08.07 18:59:48 +05'30'

( किरण गित्ते )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव

३. मा.उपमुख्यमंत्री याचे सचिव
४. मा.मंत्री, ग्रामविकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव.
५. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता,मंत्रालय,मुंबई यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री, ग्रामविकास, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे खाजगी सचिव.
८. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११.प्रधान सचिव, महसुल, मंत्रालय, मुंबई
१२.प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मुंबई
१३.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई
१४.प्रधान सचिव, कृषी विभाग,मंत्रालय,मुंबई
१५.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१६.सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ,
१७.संचालक, नगरपालिका संचालनालय, वरळी, मुंबई
१८.संचालक, भुजल सर्व्हेक्षण विकास यंत्रणा, पुणे
१९.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, अंधेरी, मुंबई
२०.विभागीय आयुक्त (सर्व)
२१.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
२३.संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
२४.डॉ.राकेशकुमार, वरिष्ठ शास्त्रज्ञ, निरी, वरळी, मुंबई
२५.प्रा.डॉ.शंकर, पर्यावरण विभाग, क्ष्क्ष्च्र्, मुंबई
२६.संचालक, वासो, बेलापूर, नवी मुंबई
२७.प्रबंधक, नाबार्ड, पुणे
२८.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने, मंत्रालय, मुंबई
२९.निवड नस्ती, पापु-०८.

प्रपत्र-१

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्र.नाबार्ड२०१४/प्र.क्र.०४/पापु-०८ दि. ५ ऑगस्ट, २०१४ चे सहपत्र

प्रकल्पात समाविष्ट असणाऱ्या गावांची यादी

| Sr.no. | Name of village | Taluka | Distt | Population |
|---|---|---|---|---|
| 1 | Ozar | Niphad | Nashik | 45954 |
| 2 | Wadi | Nagpur Rural | Nagpur | 40418 |
| 3 | Dighdoha | Hingana | Nagpur | 37016 |
| 4 | Varangaon | Bhusawal | Jalgaon | 35279 |
| 5 | Akluj | Malshiras | Solapur | 34591 |
| 6 | Vadgaon Road | Yavatmal | Yavatmal | 30756 |
| 7 | Shevgaon | Shevgaon | Ahmednagar | 30562 |
| 8 | Ghuggus | Chandrapur | Chandrapur | 29945 |
| 9 | Vadgaon Kolhati | Aurangabad | Aurangabad | 29935 |
| 10 | Hupari | Hatkanangale | Kolhapur | 28265 |
| 11 | Kabnoor | Hatkanangale | Kolhapur | 28250 |
| 12 | Kodoli Warana | Panhala | Kolhapur | 27784 |
| 13 | Jamkhed | Jamkhed | Ahmednagar | 27654 |
| 14 | Pimpalgaon Baswant | Niphad | Nashik | 26886 |
| 15 | Mohol | Mohol | Solapur | 25023 |
| 16 | Shiroli | Hatkanangale | Kolhapur | 24512 |
| 17 | Malgaon | Miraj | Sangli | 23665 |
| 18 | Loni Khd | Rahata | Ahmednagar | 23241 |
| 19 | Uralikanchan | Haveli | Pune | 22860 |
| 20 | Khaira | Palghar | Thane | 22842 |
| 21 | Khoni | Bhivandi | Thane | 22686 |
| 22 | Uchgaon | Karvir | Kolhapur | 22548 |
| 23 | Koregaon | Koregaon | Satara | 22390 |

| Sr.no. | Name of village | Taluka | Distt | Population |
|---|---|---|---|---|
| 24 | Nashirabad | Jalgaon | Jalgaon | 22212 |
| 25 | Kanhan Pimpri | Parsioni | Nagpur | 21842 |
| 26 | Chandur | Korapana | Chandrapur | 21737 |
| 27 | Chakan | Khed | Pune | 21680 |
| 28 | Shirol | Shiroli | Kolhapur | 21671 |
| 29 | Kasoda | Erandol | Jalgaon | 21598 |
| 30 | Shindakheda | Shindkheda | Dhule | 21114 |
| 31 | Nevasa Khd | Nevasa | Ahmednagar | 20790 |
| 32 | Adavad | Chopda | Jalgaon | 20756 |
| 33 | Hiwarkhed | Telhara | Akola | 20753 |
| 34 | Murud Bk | Latur | Latur | 20552 |
| 35 | Ghoti | Igatpuri | Nashik | 20206 |
| 36 | Walva | Walva | Sangli | 20129 |
| 37 | Mahalung | Malshiras | Solapur | 19983 |
| 38 | Bodwad | Bodwad | Jalgaon | 19513 |
| 39 | Mharal Bk | Kalyan | Thane | 19457 |
| 40 | Vairag | Barshi | Solapur | 19449 |
| 41 | Ghulewadi | Sangamner | Ahmadnagar | 19367 |
| 42 | Patas | Daund | Pune | 19244 |
| 43 | Umarsara | Yavatmal | Yavatmal | 19159 |
| 44 | Malegaon Bk | Baramati | Pune | 18666 |
| 45 | Atapadi | Atapadi | Sangli | 18629 |
| 46 | Otur | Junnar | Pune | 18612 |
| 47 | Chandwad | Chandwad | Nashik | 18567 |
| 48 | Chincholi | Saoner | Nagpur | 18478 |
| 49 | Pimpalner | Sakri | Dhule | 18414 |
| 50 | Muktainagar | Muktainagar | Jalgaon | 18408 |
| 51 | Barshitakali | Barshitakli | Akola | 18363 |
| 52 | Shendurni | Jamner | Jalgaon | 18311 |
| 53 | Palus | Palus | Sangli | 18296 |
| 54 | Mahadula | Kamptee | Nagpur | 18252 |
| 55 | Korochi | Hatkanagale | Kolhapur | 18120 |

| Sr.no. | Name of village | Taluka | Distt | Population |
|---|---|---|---|---|
| 56 | Malshiras | Malshiras | Solapur | 18012 |
| 57 | Dhoki | Usmanabad | Usmanabad | 17968 |
| 58 | Armori | Armori | Gadchiroli | 17784 |
| 59 | Durgapur | Chandrapur | Chandrapur | 17714 |
| 60 | Malegaon | Malegaon | Washim | 17677 |
| 61 | Rajgurunagar | Khed | Pune | 17636 |
| 62 | Satpati | Palghar | Thane | 17613 |
| 63 | Sonai | Nevasa | Ahmednagar | 17458 |
| 64 | Narayangaon | Junnar | Pune | 17349 |
| 65 | Dabhadi | Malegaon | Nashik | 17216 |
| 66 | Satara | Aurangabad | Aurangabad | 17198 |
| 67 | Wandongari | Hingana | Nagpur | 17181 |
| 68 | Ranjangaon Shenpunji | Gangapur | Aurangabad | 17162 |
| 69 | Kalamb | Indapur | Pune | 17138 |
| 70 | Kundal | Palus | Sangli | 17135 |
| 71 | Sakari | Sakari | Dhule | 17124 |
| 72 | Kalwan | Kalvan | Nashik | 17027 |
| 73 | Loni Kalbhor | Haveli | Pune | 16981 |
| 74 | Vmbhori | Rahuri | Ahmednagar | 16896 |
| 75 | Tekadi | Parsevani | Nagpur | 16880 |
| 76 | Mantha | Mantha | Jalna | 16865 |
| 77 | Patankodoli | Hatkanangale | Kolhapur | 16805 |
| 78 | Chanje | Uran | Raigad | 16707 |
| 79 | Shirasgaon Kasba | ChandurBazar | Amravati | 16606 |
| 80 | Wadegaon | Balapur | Akola | 16568 |
| 81 | Tembhurni | Indapur | Solapur | 16562 |
| 82 | Himayatnagar | Himayatnagar | Nanded | 16483 |
| 83 | Karkambha | Pandharpur | Solapur | 16398 |
| 84 | Nachangaon | Deoli | Wardha | 16370 |
| 85 | Niphad | Niphad | Nashik | 16327 |
| 86 | Umari Pra Balapur | Akola | Akola | 16264 |

| Sr.no. | Name of village | Taluka | Distt | Population |
|---|---|---|---|---|
| 87 | Wadner Bhairav | Dindori | Nashik | 16230 |
| 88 | Pastal | Palghar | Thane | 16185 |
| 89 | Chakur | Chakur | Latur | 16122 |
| 90 | Rukadi | Hatkanangale | Kolhapur | 16058 |
| 91 | Natepute | Malshiras | Solapur | 16007 |
| 92 | Lonand | Phaltan | Satara | 15936 |
| 93 | Washind | Shahapur | Thane | 15881 |
| 94 | Murbad | Murbad | Thane | 15821 |
| **95** | **Borgaon** | **Akola** | **Akola** | **15784** |
| **96** | **Rendal** | **Hatkangne** | **Kolhapur** | **15657** |
| **97** | **Waduj** | **Waduj** | **Satara** | **15547** |
| **98** | **Akole** | **Akole** | **Ahmednagar** | **15507** |
| **99** | **Nildhoh** | **Hingna** | **Nagpur** | **15381** |
| **100** | **Dindori** | **Dindori** | **Nashik** | **15330** |
| **101** | **Killari** | **Nilanga** | **Latur** | **15259** |
| **102** | **Abdullat** | **Shirol** | **Kolhapur** | **15192** |
| **103** | **Kandari** | **Bhusawal** | **Jalgaon** | **15192** |
| **104** | **Kasara (Bk)** | **Shahapur** | **Thane** | **15192** |
| **105** | **Kon** | **Bhivandi** | **Thane** | **15159** |
| **106** | **Kalamb** | **Kalamb** | **Yavatmal** | **15155** |
| **107** | **Kasegaon** | **Pandharpur** | **Solapur** | **15076** |
| **108** | **Kavthe Mahankal** | **Kavthe Mahankal** | **Sangli** | **15027** |
| **109** | **Dhanko** | **Umarkhed** | **Yavatmal** | **15026** |
| **110** | **Walwadi** | **Dhule** | **Dhule** | **15017** |

**प्रपत्र-२**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र.नाबार्ड२०१४/प्र.क्र.०४/पापु-०८ दि. ५ ऑगस्ट, २०१४ चे सहपत्र**

**२(अ) - ग्रामसभेच्या ठरावाचा नमुना**

मौजे -----------(गावाचे नांव) ------------ता.--------------जि.------------- ची ग्रामसभा ----- वार दि.------------------- रोजी --------------------यांच्या अध्यक्षतेखाली, ------------------ठिकाणी ----------वाजता घेण्यात आली. या वेळी मंजूर करण्यात आलेल्या ठराव क्र.---- ची नक्कल.

**विषय क्र.** 'नाबार्ड' च्या अर्थसहाय्याने राबविण्याच्या 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम Stage - I अंतर्गत, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प राबविण्यासाठी तसेच त्याच्या यशस्वी कार्यान्वयन व देखभाल दुरुस्तीच्या दृष्टीने करावयाच्या कार्यवाहीबाबत.

**ठराव क्र.**

१. मौजे ---------------------------गावासाठी, राज्य शासनाच्या सांडपाणी निर्मूलन व व्यवस्थापनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार, 'नाबार्ड' च्या अर्थसहाय्याने 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम Stage - I अंतर्गत, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प राबविण्याचे निश्चित झाले असुन सदरचा सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प -----------गावामध्ये राबविण्यास ही ग्रामसभा सर्वानुमते मंजूरी देत आहे.

मजीप्राच्या अद्ययावत तंत्रज्ञान सहाय्य विभागाने मौजे -------------------गावाचे संपूर्ण सर्व्हेक्षण करुन मग त्यानुसार गावातील सांडपाणी प्रक्रिया प्रकल्पाचे नियोजन केले आहे. या नियोजनाप्रमाणे

१. नियोजित सांडपाणी प्रकल्पातील भाग-१ मध्ये गावातील तुटलेल्या गटारी दुरुस्त करणे/ मुख्यत्वे करुन सांडपाणी प्रक्रीया केंद्राच्या क्षेत्रात आवश्यकतेनुसार नविन गटारी बांधणे याची तरतूद करण्यात आली आहे. या तरतूदीतून प्रकल्पात समाविष्ट केलेल्या गटारींची दुरुस्ती/ नविन गटारी बांधणे ही कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकण, अद्ययावत तंत्रज्ञान सहाय्य विभाग यांच्या अखत्यारित असतील. ही कामे सुरु असताना जागा बदलाबाबत ग्रामपंचायतीकडून हस्तक्षेप केला जाणार नाही. तसेच सविस्तर प्रकल्प अहवालात समाविष्ट असणारी नवीन गटार बांधण्याची कामे ग्रामपंचायत त्यांच्या निधी मधून हाती घेणार नाही.

२. नियोजित सांडपाणी प्रक्रिया प्रकल्पातील भाग-१ मधील तरतूदीच्या व्यतिरिक्त परंतु प्रत्यक्षात वापरावयाच्या आस्तित्वातील सर्व गटारींर्ची आवश्यकतेनुसार दुरुस्ती/ डागडुजी ग्रामपंचायतांमार्फत उपलब्ध निधीतून करण्यात येईल.

३. नियोजित सांडपाणी प्रकल्पातील भाग-१ मधील तरतूदीच्या व्यतिरिक्त परंतु प्रत्यक्षात, नियोजनाप्रमाणेचे सर्व सांडपाणी एकत्रितरित्या व्यवस्थितपणे, तसेच गुरुत्वपध्दतीने पोहोचावे याकरिता आवश्यकतेनुसार नविन गटर्सचे बांधकाम, ग्रामपंचायत --------------ही प्राप्त होणाऱ्या विविध अनुदानांमधून करुन देईल.

या सर्व बाबीसही ही ग्रामसभा मंजूरी देत आहे.

२. मौजे ---------------------------गावासाठी, राज्य शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार, 'नाबार्ड' च्या अर्थसहाय्याने 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम Stage -I अंतर्गत, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प राबविण्याचे निश्चित झाले असुन सदरचा सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यासाठी तांत्रिकदृष्टया आवश्यक असलेली जागा, तसेच नव्याने बांधावयाच्या गटारींसाठी लागणारी जागा ही उपलब्ध करुन देण्याबाबत ही ग्रामसभा सर्वानुमते मंजूरी देत आहे.

३. मौजे ---------------------------गावासाठी, राज्य शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार, 'नाबार्ड' च्या अर्थसहाय्याने 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम Stage -I अंतर्गत, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प राबविण्याचे निश्चित झाले असुन सदरचा सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प कार्यान्वि झाल्यानंतर सुरुवातीची दोन वर्षे या सांडपाणी प्रक्रीया केंद्राची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती ही महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व तंत्रज्ञान पुरवठादार यांच्यामार्फत करण्यात येणार आहे. सदरचा दोन वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर हा प्रकल्प हस्तांतरीत करुन घेऊन सदरच्या सांडपाणी प्रक्रीया केंद्राची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती ग्रामपंचायतीमार्फत करण्यास ही ग्रामसभा सर्वानुमते मंजूरी देत आहे.

प्रकल्पाअंतर्गत बांधण्यात आलेल्या, सांडपाणी प्रक्रीया केंद्राच्या सुरुवातीच्या दोन वर्षाच्या देखभाल व दुरुस्तीच्या कालावधीत तसेच त्यानंतरच्या काळात देखील, दुरुस्त केलेल्या/ नविन बांधलेल्या गटर्स सुस्थितीत ठेवून, त्याद्वारे गावांतील सांडपाणी विनासायास/ विना अडथळा सांडपाणी प्रक्रिया केंद्रापावेतो पोहोचण्यासाठी, या सर्व गटारींची स्वच्छता ठेवणे, त्यांची योग्य ती निगा राखणे, उघडया गटारींमधे कोणत्याही प्रकारचा घनकचरा (जसे की, प्लॉस्टिक बॅग्ज/ कागद/ कापड इ.) नागरिकांकडुन टाकला जाणार नाही याबाबत खबरदारी घेण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीने स्वीकारण्यास ही ग्रामसभा मंजूरी देत आहे.

मौजे---------------गावातील सर्व गटारींचे सांडपाणी गावातून वाहणाऱ्या ---- --------- -नाल्यात एकत्रित होते व तेथून ते पुढे नियोजित सांडपाणी प्रक्रिया प्रकल्पाच्या जागेपर्यंत पोहोचते. या नाल्यातील सांडपाण्याचा प्रवाह कोणत्याही प्रकारे अडणार नाही, या नाल्यात, नाल्याच्या काठावर कोणत्याही प्रकारे घनकचरा/ घाण/ माती/ दगड/ विटा इ. टाकले जाणार नाही याची आवश्यक ती काळजी घेण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीने स्वीकारण्यास ही ग्रामसभा मंजूरी देत आहे.

थोडक्यात गावात तयार होणारे सांडपाणी एकत्रितपणे, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्पापावेतो विनाअडथळा व तेही योग्य प्रमाणात पोहचण्यासाठी आवश्यक ती सर्व कार्यवाही करण्यासाठीची जबाबदारी ग्रामपंचायतीने स्वीकारण्यास ही ग्रामसभा मंजूरी देत आहे.

४. मौजे ---------------------------गावासाठी, राज्य शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार, 'नाबार्ड' च्या अर्थसहाय्याने 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम Stage -I अंतर्गत, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प राबविण्याचे निश्चित झाले असून सदरचा सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पाच्या कार्यान्वयानंतर या प्रकल्पाद्वारे उपलब्ध होणाऱ्या प्रक्रीया केलेल्या सांडपाण्याचा पुनर्वापर करण्यासाठी तसेच अश्या प्रकारे प्रक्रीया केलेल्या सांडपाण्याचा पुनर्वापर करण्यासाठी आवश्यक ती पुढील सर्व कार्यवाही ग्रामपंचायतीने करण्यासाठी ही ग्रामसभा मंजूरी देत आहे.

५. मौजे ---------------------------गावासाठी, राज्य शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार, 'नाबार्ड' च्या अर्थसहाय्याने 'ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन कार्यक्रम Stage-I अंतर्गत, सांडपाणी प्रक्रिया प्रकल्प राबविण्याचे निश्चित झाले असुन सदरचा सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर सुरुवातीची दोन वर्षे या सांडपाणी प्रक्रीया केंद्राची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती ही महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व तंत्रज्ञान पुरवठादार यांच्यामार्फत करण्यात येणार आहे. सदरचा दोन वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर सदरच्या सांडपाणी प्रक्रीया केंद्राची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती ग्रामपंचायतीमार्फत करावयाची आहे. तसेच संपूर्ण प्रकल्पाची सुरुवातीपासूनची दैनंदिन देखभाल दुरुस्ती ही ग्रामपंचायतीने करावयाची आहे. सदर दैनंदिन देखभाल दुरुस्तीचा खर्च भागविण्यासाठी, प्रक्रीया केलेले सांडपाणी पुनर्वापरासाठीचे दर ठरविण्यास व वसूल करण्यास तसेच आवश्यकता भासल्यास दरघरटी वार्षीक स्वच्छता कर आकारणी करण्यास व वसूल करण्यास देखील ही ग्रामसभा सर्वानुमते मंजूरी देत आहे. सांडपाणी कराच्या आकारणीच्या किमान ८५% वसुली करण्यासाठी सर्वोतोपरी प्रयत्न करण्यात येतील याबाबतही ही ग्रामसभा सर्वानुमते मंजूरी देत आहे.

ठराव सर्वानुमते मंजूर.

सूचक अनुमोदक

## २(ब) - ग्रामपंचायत / गांव पाणी पुरवठा स्वच्छता समितीची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या :

शासनाने वेळो वेळी गाव पाणी पुरवठा व स्वच्छता समितीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या या विषयी मार्गदर्शक सूचना परिपत्रकाव्दारे आणि विविध शासन निर्णयाव्दारे निर्गमीत केल्या आहेत. या पाणी पुरवठा व स्वच्छता समितीचे गावातील सांडपाणी व्यवस्थापन हे ही एक महत्वाचे कर्तव्य आहे. ग्रामस्तरावरील पाणी पुरवठा समितीची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या खालील प्रमाणे आहेत.

- ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन योजनांची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती करणे.
- गावात निर्माण होणारे सांडपाणी व प्रक्रीयोत्तर सांडपाणी यांची दर तीन महिन्यांनी महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाकडून तपासणी करणे व प्राप्त निष्कर्ष, नोंदवही मध्ये नोंद करणे. प्रक्रियोत्तर सांडपाण्याचे निकष महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या मापदंडाच्या मर्यादेपेक्षा जास्त आढळल्यास तंत्रज्ञान पुरवठादाराशी सल्लामसलत करुन आवश्यक ती उपाय योजना करणे.
- सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पातील इतर भाग जसे सांडपाणी संकलन व वहन व्यवस्थांची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती करणे.
- गावातील अस्तीत्वातील तसेच नव्याने बांधावयाच्या व दुरुस्त केलेल्या संकलन व वहन व्यवस्थेच्या गटारींमधून वाहणारे सांडपाणी कुठेही न अडता सांडपाणी प्रक्रीया केंद्रापर्यंत येईल, या करीता ग्रामपंचायतीने आपल्या नियमित कर्मचाऱ्यांकडून गटारांची व वहन व्यवस्थेची दैनंदिन स्वच्छता करुन देखभाल व दुरुस्ती योग्यरित्या होत आहे. या बाबत दक्षता घेणे.
- सांडपाणी प्रक्रीया केंद्रातील यांत्रिक भागांची दुरुस्ती करणे.
- निर्माण झालेल्या प्रक्रीयोत्तर सांडपाण्याचे व्यवस्थापन करणे व लाभार्थी शेतकऱ्यांना आवश्यक ती पाणी पट्टी ठरविणे व ग्रामस्थांवर आवश्यक तो सांडपाणी कर आकारणे.
- सांडपाणी प्रक्रीया केंद्राची मोडतोड / तुटफूट होणार नाही याची वेळोवेळी काळजी घेणे व सुरक्षा करणे.
- सांडपाणी पट्टी वसूलीस ग्रामसेवकास मदत करणे.
- गावातील सांडपाणी व्यवस्थापन विषयक इतर व्यवस्थांची (जसे सोकपिट, परसबाग इ.) दैनंदिन देखभाल व दुरुस्ती करणे.
- गावातील सांडपाणी व्यवस्थेच्या देखभाल व दुरुस्तीच्या अनुषंगाने येणाऱ्या सर्व अडचणींचे निराकरण करणे.
- आकारण्यात येणाऱ्या सांडपाणी कराच्या किमान ८५% वसुली करण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.
- सांडपाणी प्रक्रीया केंद्राचे नुकसान औद्योगिक उद्योगांव्दारे निर्माण होणारे रासायनिक पाण्यामुळे झाल्यास त्यांच्यावर दंडात्मक कारवाई करण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

## प्रपत्र-३
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्र.नाबार्ड२०१४/प्र.क्र.०४/पापु-०८ दि. ५ ऑगस्ट, २०१४ चे सहपत्र

३ (अ) - सांडपाण्याचे नमुने खालील Parameters साठी तपासण्यात येतील.

१. Bio chemical Oxygen Demand (BOD)

२. Chemical Oxygen Demand (COD)

३. Suspended Solids (SS)

४. Total Desolved Solids (TDS)

५. Ph (Hydgogen Ion Concentration)

६. Detergents

७. Nitrates (NO३)

८. TKN (Total Kdjhdal Nitrogen)

९. Phosphate.

३(ब) – प्रक्रिया केलेल्या सांडपाण्याचे मापदंडानुसार निकष :-

Water Quality Standards for verious uses

| Category of Fresh Water | A - I | A-II | A-III | A-IV |
|---|---|---|---|---|
| Best Usage | Unfiltered Public water supply after approved disinfection | Public water supply with approved treatment equal to coagulation, sedimentation & disinfection. | Not fit for human consumption, Fish & Wildlife Propagation. | Fit for Agriculture, Industrial cooling & process water. |
| Chemical Qualities : Maximum allowable concentration | | | | |
| Toxic Substances | | | | |
| Arsenic (As) | ०.३ mg/l | ०.३ mg/l | १.० mg/l | ०.१ mg/l |
| Cadmium (Cd) | ०.०१ mg/l | ०.०१ mg/l | – | – |
| Chromium ( Cr) | ०.०५ mg/l | ०.०५ mg/l | ०.०५ mg/l | ०.२ mg/l |
| Cyanide (CN) | ०.०५ mg/l | ०.१ mg/l | ०.०५ mg/l | ०.२ mg/l |
| Lead (Pb) | ०.१ mg/l | ०.१ mg/l | – | ०.१ mg/l |
| Boron (B) | – | – | – | २.० mg/l |
| Mercury (Hg) | ०.००१ mg/l | ०.००१ mg/l | ०.००१ mg/l | – |
| Gross alpha activity | ३ PCI/l | १०-९ uc/ml | ३ PCI/l | ३ PCI/l |
| Gross Beta activity | ३० PCI/l | १०-८ uc/m | ३० PCI/l | ३० PCI/l |
| Substances affecting health | | | | |
| Fluoride (F) | १.५ mg/l | १.५ mg/l | – | १.० mg/l |
| Nitrates (NO३) | ४५ mg/l | ४५ mg/l | – | – |

| Category of Fresh Water | A - I | A-II | A-III | A-IV |
|---|---|---|---|---|
| Best Usage | Unfiltered Public water supply after approved disinfection | Public water supply with approved treatment equal to coagulation, sedimentation & disinfection. | Not fit for human consumption, Fish & Wildlife Propagation. | Fit for Agriculture, Industrial cooling & process water. |
| Substances affecting the potability of water | | | | |
| pH | ६.५ to ८.५ | ६.० to ८.५ | ६.५ to ९.० | ६.५ to ९.० |
| T.D.S. | - | T.D.S. | T.D.S. | -. |
| Total Solids | १५०० mg/l. | १५०० mg/l. | -. | - |
| Total Suspended Solids | २५ mg/l | - | - | - |
| Total Hardness (Caco३) | ५० mg/l | - | - | - |
| Total Residual Chlorine | - | - | - | - |
| Electrical conduct at २५. C | - | - | १००० x १०-६ mhos | ३००० x १०-६ mhos |
| Free Carbon Di Oxide | - | - | १२ mg/l | - |
| Free Ammonical Nitrogen | - | - | १.२ mg/l | - |
| Oil & Grease | - | - | ०.१ mg/l | - |
| Pesticides | - | - | ०.०२ mg/l | - |
| Biotic Index | - | - | ६.० mg/l | - |
| Total Ammonical Nitrogen | १.५ mg/l | १.५ mg/l | - | ५० mg/l |
| Chlorides (Cl) | ६०० mg/l | ६०० mg/l | - | ६०० mg/l |
| Sulphates | ४०० mg/l | ४०० mg/l | - | १००० mg/l |
| Copper (Cu) | १.५ mg/l | १.५ mg/l | - | - |

| Category of Fresh Water | A - I | A-II | A-III | A-IV |
|---|---|---|---|---|
| Best Usage | Unfiltered Public water supply after approved disinfection | Public water supply with approved treatment equal to coagulation, sedimentation & disinfection. | Not fit for human consumption, Fish & Wildlife Propagation. | Fit for Agriculture, Industrial cooling & process water. |
| Manganese (Mn) | ०.५ mg/l | ३.० mg/l | - | - |
| Iron (Fe) | १.० mg/l | ५.० mg/l | - | - |
| Sodium | - | - | - | - |
| Zinc (Zn) | १५.० mg/l | १.५ mg/l | ५.० mg/l | ५.० mg/l |
| Phenolic Compounds | ०.००२ mg/l | ०.००२ mg/l | ०.०५ mg/l | - |
| Alkyl Benzene sulphates | १.० mg/l | १.० mg/l | - | - |
| Mineral Oil | ०.३ mg/l | ०.३ mg/l | - | - |
| Ammonia | १.५ mg/l | १.५ mg/l | - | - |
| B.O.D. (५ days २० . C) | २.० mg/l(Monthly average of atleast १० samples) | ५.० mg/l(Monthly average of atleast १० samples) | १० mg/l | ३० mg/l |
| C.O.D. | - | - | - | १५० mg/l |
| D.O. | Not less than ५ m g/l (Monthly average of १०० samples) | ४.० mg/l | Not less than ३ mg/l | Not less than २ mg/l |
| (MPN/१००) | | | Source : MPCB Website | |

## ३ (क) - दोन भारतीय अधिकृत व नामांकित संस्थांनी विकसित केलेले जैविक तंत्रज्ञान




Schematic Diagram of Phytorid System

Components

- Sump for sewage collection
- Settling Tank
- Phytorid Bed
- Treated Water Tank (optional)
- Pump for reuse of the treated Water

